सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरीता प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण या (२४०६ ८५८९) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांकः सावनि-२०१७/प्र.क्र.५७/फ-११
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ मे, २०१७.

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क.६८/अर्थसंकल्प-३, दि.०१.०४.२०१७.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र:बीयुडी-२०१७/२४०६/प्र.क्र.९१/ब-१, दि.०१.०४.२०१७. दि.१०.०४.२०१७.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र: सावनि-२०१७/प्र.क्र.५७/फ-११, दि. १३.०४.२०१७.

प्रस्तावना :-

सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सामाजिक वनीकरणांतर्गत **"प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण, २४०६ ८५८९"** या योजनेंतर्गत रु. ४०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. या योजनेअंतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात माहे-एप्रिल, २०१७ व मे, २०१७ या कालावधीकरिता रुपये रु.६६६.६६ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

आता या लेखाशिर्षांतर्गत उर्वरित कालावधीसाठी ८०% मर्यादेत रु. २५३३.३० लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०१७-१८ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या **"प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण, २४०६ ८५८९"** या योजनेकरिता रु.४०००.०० लक्ष इतका निधी मार्च, २०१७ मधील अर्थसंकल्पीय अधिवेशनात अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पीत निधी पैकी ८०% च्या मर्यादेत माहे जून, २०१७ ते मार्च, २०१८ अखेर या कालावधी करिता रु. २५३३.३० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. **विवरणपत्र-१** प्रमाणे निधी वितरणाचा कॅश फ्लो सोबत जोडला आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास प्रधान मुख्य वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत व्हावे.

**५.** सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**"मागणी क्र.सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनांतर्गत) (०१) वनीकरण, ००३, शिक्षण व प्रशिक्षण (००) (०३) प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण-२६ जाहिरात व प्रसिध्दी/५०-इतर खर्च (२४०६ ८५८९)".**

६. सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५२३१६४९१०७६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.05.23 17:00:11 +05'30'

**( डी. एल. थोरात )**
**सह सचिव, (वने)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
५. सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
६. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई४०० ०३२.
९. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१०. वित्त विभाग, व्यय-०९, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी, फ-२,फ-७,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवडनस्ती/फ-११.

<u>विवरणपत्र -१</u>

शासन निर्णय क्र.सावවि-२०१७/प्र.क्र.५७/फ-११, दि. २३ मे, २०१७.

योजनेचे नाव:- “वनेतर क्षेत्रातील पाणथळे, सरोवरे इत्यादी ठिकाणच्या जैवविविधतेचे व्यवस्थापन”
मुख्य लेखाशीर्ष:- (२४०६ ८५८९)

(रु. लाखात)

| सविस्तर लेखाशीर्ष | उपशिर्ष | अर्थ-संकल्पीत तरतूद | जून, २०१७ | जुलै, २०१७ | ऑगस्ट, २०१७ | सप्टें., २०१७ | ऑक्टो., २०१७ | नोव्हें., २०१७ | डिसें., २०१७ | जाने., २०१८ | फेब्रु., २०१८ | मार्च, २०१८ | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मागणी क्र.सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनांतर्गत) (०१) वनीकरण, ००३, शिक्षण व प्रशिक्षण (००) (०३) प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण-२६ जाहिरात व प्रसिध्दी/५०-इतर खर्च (२४०६ ८५८९) | २६ जाहिरात व प्रसिध्दी | ३०००.०० | १९०.०० | १९०.०० | १९०.०० | १९०.०० | १९०.०० | १९०.०० | १९०.०० | १९०.०० | १९०.०० | १९०.०० | **१९००.००** |
| | ५० इतर खर्च | १०००.०० | ६३.३३ | ६३.३३ | ६३.३३ | ६३.३३ | ६३.३३ | ६३.३३ | ६३.३३ | ६३.३३ | ६३.३३ | ६३.३३ | **६३३.३०** |

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.05.23 17:01:05 +05'30'

( डी.एल.थोरात )
सह सचिव, (वने)
महसूल व वन विभाग